उद्योग संचालनालयातील गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड मधील पदांवर पदोन्नती देण्याकरीता विभागीय पदोन्नती समितीचे पुनर्गठण करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र.: विपस २०२५/प्र.क्र.३४/ उद्योग-३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. २१ फेब्रुवारी, २०२५

वाचा :

१) उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.: आयएसटी-२००३/(७३५२)/उद्योग-३, दि.०१.०१.२००४ आणि दि.०९.०२.२००४
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.: एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/का.१२, दि.०१.०८.२०१९

**प्रस्तावना :**

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड संवर्गातील पदांवर पदोन्नती देण्यासाठी पात्रता तपासून शिफारस करण्याकरीता उपरोक्त अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निवड समित्यांची स्थापना करण्यात आलेली आहे. उपरोक्त वाचा अ.क्र. २ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयान्वये राज्य शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्याकरीता अनुसरावयाच्या कार्यवाही बाबतची एकत्रित मार्गदर्शक तत्वे निर्गमित करण्यात आलेली आहेत. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील दि.०१.०१.२००४ आणि शुद्धीपत्रक दि.०९.०२.२००४ रोजीचे शासन निर्णय अधिक्रमित करुन उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड संवर्गातील पदांवर पदोन्नतीसाठी शिफारस करण्यासाठी विभागीय पदोन्नती समिती पुनर्गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

उद्योग संचालनालय (मुख्यालय) व उद्योग संचालनालयाच्या अखत्यारीतील मैत्री कक्ष, मुंबई प्राधिकरण विभाग या कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील सर्व पदे व गट-ड या संवर्गातील पदांवर पदोन्नती देण्याकरीता खालीलप्रमाणे विभागीय पदोन्नती समिती पुनर्गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | विकास आयुक्त (उद्योग) | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त उद्योग संचालक | सदस्य |
| ३ | उद्योग सहसंचालक /अधिक्षकीय उद्योग अधिकारी (आस्थापना) | सदस्य |
| ४ | उद्योग संचालनालयातील गट-अ संवर्गातील मागासवर्गीय अधिकारी, गट-अ संवर्गातील अधिकारी उपलब्ध नसल्यास गट-ब संवर्गातील मागासवर्गीय अधिकारी | मागासवर्गीय प्रतिनिधी तथा सदस्य |
| ५ | उद्योग उपसंचालक (प्रशासन) | सदस्य सचिव |

२. तसेच उद्योग संचालनालयाच्या अखत्यारीतील सर्व विभागीय कार्यालये आणि सर्व जिल्हा उद्योग केंद्र या कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित), गट-क (उद्योग निरिक्षक संवर्ग वगळून) व गट-ड पदांवर पदोन्नतीकरीता खालीलप्रमाणे विभागीय पदोन्नती समिती पुनर्गठीत करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **अधिकाऱ्याचे पदनाम** | **समितीतील पद** |
|---|---|---|
| १ | उद्योग सहसंचालक, संबंधित विभागीय कार्यालय | अध्यक्ष |
| २ | विभागातील ज्येष्ठ अधिक्षकीय उद्योग अधिकारी | सदस्य |
| ३ | उद्योग संचालनालय (मुख्यालय) येथील आस्थापना विषयक कामकाजाकरीता नियुक्त गट-अ मधील अधिकारी | सदस्य |
| ४ | संबंधित विभागातील गट-अ मधील मागास प्रवर्गातील अधिकारी, गट-अ संवर्गातील अधिकारी उपलब्ध नसल्यास गट-ब संवर्गातील मागासवर्गीय अधिकारी | मागासवर्गीय प्रतिनिधी तथा सदस्य |
| ५ | संबंधित विभागीय कार्यालयातील आस्थापना विषयक कामकाजाकरीता नियुक्त उद्योग उपसंचालक | सदस्य सचिव |

३. सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी पदोन्नती देण्याच्या संदर्भात आणि मानीव दिनांक देण्यासंदर्भात निर्गमित केलेले आदेश/ मार्गदर्शक सूचना मधील तरतुदी विचारात घेऊन, विभागीय पदोन्नती समितीने पदोन्नतीसाठी/ मानीव दिनांकासाठी पात्र अधिकारी/ कर्मचारी यांची निवडसूची तयार करुन नियुक्ती प्राधिकाऱ्यास पदोन्नतीसाठी शिफारस करण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०२२११५५७३७६२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHASHANK
TUKARAM CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2025.02.21 15:58:57 +05'30'

**( शशांक चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

१. मा. मंत्री (उद्योग ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (उद्योग ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई ४०० ०३२.
४. सहसचिव (उद्योग-३), उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. उपसचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई.
७. अधिक्षकीय उद्योग अधिकारी (आस्थापना), उद्योग संचालनालय, मुंबई.
८. निवडनस्ती (उद्योग-३)